**संसदीय कार्य विभागासाठी नवीन संगणक संच खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यंत्रसा १५२१/प्र.क्र. १९ /तीन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २२ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

०१.शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग३/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६
०२.शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट २०१७
०३.कार्यालयीन आदेश, संसदीय कार्य विभाग, क्रमांक राअभा ६०१८/ प्र.क्र.२/तीन दिनांक ३ ऑगस्ट २०१८

**प्रस्तावना** :-

संसदीय कार्य विभागातील संगणक साहित्याचा आढावा घेण्यात आला आहे. आयुष्यमान संपलेल्या संगणकांची संख्या व विभागाच्या विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाची तातडी विचारात घेऊन या विभागासाठी ०८ संगणक संच खरेदी करण्याचा प्रस्ताव या विभागाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने, खरेदी प्रक्रिया पार पाडण्यासाठी शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलवर या विभागाची खरेदीदार विभाग म्हणून नोंदणी करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील आदेशान्वये विभागासाठी खरेदी अधिकारी तथा वस्तु ताब्यात घेणारा (Consignee) अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी व पडताळणी अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली आहे. अशाप्रकारे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निश्चित केलेल्या धोरणाच्या अधीन राहून संसदीय कार्य विभागासाठी आवश्यक असलेल्या वर नमूद केलेल्या साहित्याची खरेदी प्रक्रिया पूर्ण करावयाची आहे. त्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर या विभागातील आयुष्यमान संपलेल्या संगणकांची संख्या व विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाची तातडी विचारात घेता, या विभागासाठी ०८ संगणक संच खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर तरतूदीमधून आवश्यक निधी खर्च करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

लेखाशिर्ष : ' मागणी क्रमांक - पी - १
मुख्यलेखाशिर्ष २०५२ - सचिवालय - सर्वसाधारण सेवा
०९० - सचिवालय,
(००)(०१) संसदीय कार्य विभाग (अनिवार्य)
संकेतांक (२०५२ ०२६८)
१७, संगणक खर्च '

२. सदर खरेदी निधीच्या उपलब्धतेनुसार दोन किंवा अधिक टप्प्यांमध्ये करण्यात येईल.

३. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन २ व ४ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार GeM पोर्टलवरुन विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन करण्यात येत आहे. संगणकाचे तांत्रिक तपशील हे सामान्य प्रशासन विभाग (मा.त.सं.) यांच्या मान्यतेने ठरविण्यात आले आहेत.

४. वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ १३ / विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग - पहिला, उपविभाग दोन मधील अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक ७६ खाली प्रशासनीक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांच्या मर्यादेच्या अधीन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२२१७४८५७६५१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUJATA PRAKASH TERWANKAR

Digitally signed by SUJATA PRAKASH TERWANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PARLIAMENTRY AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=fe4e4d94a8c7920125c3cbe38801bc41cded8a57206fbec66ab1308bde50a23a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28E25151E1ED0C32766D3CE50C361EFAB0997CBA01832F4A72AF949EDDAD14D1, cn=SUJATA PRAKASH TERWANKAR
Date: 2023.08.22 17:51:02 +05'30'

**( सुजाता प्र. तेरवणकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

०१.मा.मंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
०२.सचिव (संसदीय कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
०३.महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य , (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
०४.महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा)मुंबई / नागपूर
०५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
०६.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
०७.कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
०८.निवडनस्ती.